## ४९. श्रीगणेशहृदयकथन -



श्रीशौनक म्हणतात - हे श्रीसूता - आता आपण विशेषत्वाने श्रीशंकर तथा सनकादिकांचा सर्वसिद्धिकर संवाद सांगावा. नानाविध अवतारांनी युक्त असणाऱ्या धूर्मवर्णांचे चरित्र ऐकल्यावर योगसिद्धी मिळविण्याकरिता सनकादिक काय म्हणाले?

श्रीसूत म्हणतात - अहंकार निग्रहणासह श्रीधूम्रवर्णांचे चरित्र श्रवण करून रोम रोम आनंद विभोर झालेल्या ऋषींनी श्रीशंकरांना विचारले. श्रीसनकादिक म्हणतात - हे सदाशिवा, विविध अवतारांसह श्रीधूर्मवर्णचरित्र

श्रवण करून आम्ही संतुष्ट झालो आहोत. हे सर्वेश, योगिनायका, आता आम्हास योगप्राप्तीकरीता शीघ्र तथा सुगम मार्ग उपदेशावा.

श्रीशिव म्हणतात - महाभागांनो, मी आपणास साधकांना शीघ्र फल देणारे श्रीगणेशहृदय सांगतो. पूर्वी मी श्रीगणेश ध्यानात असतांना देवी गंगेने मला प्रश्न केला. देवीगंगा म्हणाली - हे शंकरा, आपण नित्य कोणाचे ध्यान करता? आपल्यापेक्षा श्रेष्ठ कोण आहे? ते जाणण्याची मला इच्छा आहे.

श्रीशंकर म्हणतात - श्रीब्रह्मब्रह्मेश, आमचे सनातन कुलदेव असणाऱ्या देवदेवेश श्रीगणनाथांचे मी स्मरण करतो. त्यांचे सर्वस्वदायक गुप्त असे हृदय मी तुला सांगतो. त्याने तू श्रीविघ्नेशांना जाणू शकशील. पूर्वी मी अज्ञान आवृत्त असतांना तपाचरण रत होतो. त्यावेळी तप:प्रभावाने माझ्या हृदयात श्रीगणनाथांचे मला दर्शन घडले. त्यांच्या दर्शनमात्रे मला स्फूर्ती झाली व श्रीगणेश तत्वज्ञानाने मी परमानंदपूर्वक योगींद्रवंद्य झालो. तेव्हा मी तुला ते गणेशहृदय सांगतो ज्याने तू गाणेशयोगात निपुण होशील.

**ॐ अस्य श्रीगणेशहृदयस्तोत्रमंत्रस्य। शंभुर्ऋषि:। नाना छंदासि। गणेशो देवता। गमिति बीजम्। ज्ञानत्मिका शक्ति:। नाद:कीलकम्। श्रीगणपतिप्रीत्यर्थमभीष्टसिद्धर्थं जपे विनियोग:।ॐ। गमित्येकाक्षरात्मकबीजै: करन्यासा: षडंगन्यासाश्च। अथ ध्यानम्। सिंदूराभं त्रिनेत्रं पृथुतरजठरं रक्तवस्त्रावृत्तं तं पाशं चैवांकुशं वै रदनमभयकं पाणिभि: संदधानम्। सिद्ध्या बुद्ध्या प्रशिष्टं गजवदनमहं चिंतये ह्येकदंतं नानाभूषाभिरामं निजजनसुखदं नाभिशेषं गणेशम्॥१४॥ एवं ध्यात्वा मानसोपचारै: पूजयेत्। किंचिन्मूलमंत्रं जप्त्वा हृदयं पठेत्॥ ॐ गणेशमेकदंतं चं चिंतामणिं विनायकम्। ढुंढिराजं मयूरेशं लंबोदरं गजाननम्॥१५॥ हेरंबं वक्रतुंडं च ज्येष्ठराजं निजस्थितम्। आशापूरं तु वरदं विकटं धरणीधरम्॥१६॥ सिद्धिबुद्धिपतिं वंदे ब्रह्मणस्पतिसंज्ञितम्। मांगल्येशं सर्वपूज्यं विघ्नानां नायकं परम्॥१७॥ एकविंशति नामानि गणेशस्य महात्मन:। अर्थेन संयुतान्येव हृदयं परिकीर्तितम्॥१८॥**

देवीगंगा म्हणाली - या एकवीसही नावांचा हे सदाशिवा आपण अर्थ सांगावा. हे करूणानिधे! याद्वारेच मी गणेशहृदय जाणू शकेल.

**ग कारस्रूपं विविधं चराचरं ण कारगं ब्रह्म तथा परात्परम्। तयो: स्थितास्तस्य गणा:प्रकीर्तिता गणेशमेकं प्रणमाम्यहं परम्॥२०॥ मायास्वरूपं तु सदैकवाचकं दंत: परो मायिकरूपधारक:। योगे तयोरेकरदं सुमानिनि धीस्थं नतोऽहं जनभक्तिलालसम्॥२१॥ चित्तप्रकाशं विविधेषु संस्थं लिप्तं न लेपादि विरर्जितं तम्। भोगैर्विहीनं त्वथ भोगकारं चिंतामणिं तं प्रणमामि नित्यम्॥२२॥ विनायकं नायकवर्जितं प्रिये विशेषतो नायकमीश्वरात्मनाम्। निरंकुशं तं प्रणमामि सर्वदं सदात्मकं भावयुतेन चेतसा॥२३॥ वेदा: पुराणानि महेश्वरादिका: शास्त्राणि योगेश्वरदेवमानवा:। नागासुरा ब्रह्मगणाश्च जंतवो ढुंढंति वंदे त्वथ**

ढुंढिराजकम्॥२४॥ मायार्थवाच्यो हि मयूरभावो नाना भ्रमार्थं प्रकरोति तेन। तस्मान् मयूरेशमथो वदंति नमामि मायापतिमासमंतात्॥२५॥ यस्योदराद्विश्वमिदं प्रसूतं ब्रह्माणि तद्वज्जठरे स्थितानि। अनंतरूपं जठरं हि यस्य लंबोदरं तं प्रणतोऽस्मि नित्यम्॥२६॥ जगद्गलाधो गणनायकस्य गजात्मकं ब्रह्मशिर: परेशम्। तयोश्च योगे प्रवदंति सर्वे गजाननं तं प्रणमामि नित्यम्॥२७॥ दीनार्थवाच्यस्त्वथ हेर्जगद्वी ब्रह्मार्थवाच्यो निगमेषु रंब:। तत्पालकत्वाच्च तयो: प्रयोगे हेरंबमेकं प्रणमामि नित्यम्॥२८॥ विश्वात्मकं यस्य शरीरमेकं तस्माच्च वक्रं परमात्मरूपम्। तुंडं तदेवं हि तयो: प्रयोगे तं वक्रतुंडं प्रणमामि नित्यम्॥२९॥ माता पिताऽयं जगतां परेषां तस्याऽपि माता जनकादिकं न। श्रेष्ठं वदंते निगमा: परेशं तं ज्येष्ठराजं प्रणमामि नित्यम्॥३०॥ नाना चतु:स्थं विविधात्मकेन संयोगरूपेण निजस्वरूपम्। पूर्यस्य सा पूर्णसमाधिरूपा स्वानंदनाथं प्रणमामि चात:॥३१॥ मनोरथान् पूरयतीहं गंगे चराचराणां जगतां परेषाम्। अतो गणेशं प्रवदंति चाशाप्रपूरकं तं प्रणमामि नित्यम्॥३२॥ वरै: समास्थापितमेव सर्वं विश्वं तथा ब्रह्मविहारिणा च। अत: परं विप्रमुखा वदंति वरप्रदं तं वरदं नतोऽस्मि॥३३॥ मायामयं सर्वमिदं विभातिमिथ्यास्वरूपं भ्रमदायकं च। तस्मात् परं ब्रह्म वदंति सत्यमेनं परेशं विकटं नमामि॥३४॥ चित्तस्य प्रोक्ता मुनिभि: पृथिव्यो नानाविधा योगिभिरेव गंगे:। तासां सदा धारक एक एव वंदे च धरणीधरमादिभूतम्॥३५॥ विश्वात्मिका ब्रह्ममयी हि बुद्धिस्तस्या विमोहप्रदिका च सिद्धि:। ताभ्यां सदा खेलति योगनाथस्तं सिद्धिबुद्धीशमथो नमामि॥३६॥ असत्यसत् साम्यतुरीयनैज्यगनिवृत्तिरूपाणि विरच्य खेलक:। सदा स्वयं योगमयेन भाति तं नमाम्यतोऽहं त्वथ ब्रह्मणस्पतिम्॥३७॥ अमंगलं विश्वमिदं सहात्मभिरयोगसंयोगयुतं प्रणश्वरम्। तत: परं मंगलरूपधारकं नमामि मांगल्यपतिं सुशांतिदम्॥३८॥ सर्वत्र मान्यं सकलावभासकं सुज्ञै: शुभादावशुभादिपूजितम्। पूज्यं न तस्मान्निगमादिसंमतं तं सर्वपूज्यं प्रणतोऽस्मि नित्यम्॥३९॥ भुक्तिं च मुक्तिं प्रददाति तुष्टो भक्तिप्रियो यो निजविघ्नहा च। भक्त्या विहीनाय ददाति विघ्नांस्तं विघ्नराजं प्रणमामि नित्यम्॥४०॥

हे प्रिये, श्रीविघ्नेश्वरांचे रहस्य तुला मी नावांच्या अर्थांसह सांगितले. ही एकवीस नावे जाणून नर परब्रह्ममय होतो. देवी गंगा म्हणाली - नावांचे जे गणेशहृदय आपण सांगितले ते ब्रह्मपददायी आहे. मात्र मला त्याचा अनुभव नाही. (हा केवळ शब्दज्ञानाचा भाग झाला. अनुभवाचे काय?) त्याकरिता मार्ग सांगावा.

श्रीशंकर म्हणतात - मंत्र घेऊन पुरश्चरण पद्धतीने श्रीगणेशाराधन कर. त्याने तुला ज्ञान होईल यात संशय नाही. श्रीगणेशमंत्राचे रहस्य मी तुला सांगतो. श्रीगणेश व त्यांचा मंत्र भिन्न नाहीच.

'ग' कार म्हणजे ब्रह्मदेव, 'अ'कार म्हणजे श्रीविष्णू, बिंदू अर्थात अनुस्वार म्हणजे श्रीशिव व अनुनासिक (असा नंतरचा नाद) म्हणजे श्रीसूर्य होय. त्यांची संधी म्हणजे श्रीशक्ती होय. असा हा मंत्र असून त्यांची संयोगकारी देवता श्रीगणेश असतात.

त्यांच्यापासून पुढे ॐकार तथा समस्त विश्व निर्माण होते. म्हणूनच हा एकाक्षरीमंत्र ॐकारासह उच्चारावा.

तो ॐकार सहा घटकांचा समजावा. अकार उकार मकार नाद तथा बिंदू तथा शून्य. हे सदित्वरे! गंगे, त्यांच्यातील भेद सांगतो तो ऐक. शून्य संदेही म्हणतात तर बिंदूस देह. त्यांच्यापासून चतुर्विध स्वरूपाचे स्थूलसूक्ष्मादि भेदयुक्त विश्व प्रगटते. अशा रीतीने श्रीगणराजांचा मंत्रराज जाणावा.

प्रारंभी शास्त्रात वर्णिल्याप्रमाणे न्यास इ. विधी करावेत. त्यानंतर श्रीगणेशपूजन करून मग ज्ञानी व्यक्तीने गणेशमंत्र जप करावा. त्याच्या दहा भागाचा होम करावा. त्याच्या दहाव्या भागाने तर्पण करावे. त्याच्या १० व्या भागाने मार्जन करावे. तथा त्याच्या दहाव्या भागाइतक्या संख्येच्या ब्राह्मणांना भोजन घडवावे. यास व्रतपंचांग म्हणतात. हे यथाविधी केले असता तात्काळ फळ देते. अतः तू मंत्रराजाचे पंचक आचरावेस. असे म्हणून तिला विधिपूर्वक श्रीगणेशांचा मंत्र प्रदान केला. ती मला प्रणाम करून तपाचरणार्थ गेली. श्रीक्षेत्र मोरगांवला येऊन गंगेने मंत्रध्यानपूर्वक तपाचरण केले. त्या नदीश्रेष्ठीने एक पुरश्चरण केले. त्यावेळी भक्तवत्सल भगवान प्रसन्न झाले. त्यांच्या कृपेने तिच्या हृदयात ध्यान प्रगटले व त्यामुळे तिला एकवीसही नावांचा अर्थ त्याचक्षणी ज्ञात झाला. तेव्हा आनंदित झालेली देवी गंगा नित्य भक्तियुक्तरीत्या श्रीगणेशाराधन करीत तेथेच थांबली.

श्रीसनकादिक विचारतात - ब्रह्मभूता झालेली देवी गंगा कोणत्या प्रकारे श्रीगणेशाराधन करीत होती, ते कृपया आम्हास सांगावे.

श्रीशिव म्हणतात - ब्रह्मभूत झालेला योगी श्रीगणेशांना नवप्रकारांनी सदैव आळवत असतो. पुत्र, पत्नी, सखागण, द्रव्य, वृत्ती, विद्या या सगळ्यांसह स्वर्ग, मोक्ष हे सर्व सर्व स्वामी गुरू, विघ्नपतीच होत. संसर्गाने घडणारी, शरीराची, वाणीची सर्व कर्मे तीनही देहांची व मनाची कार्ये हृदयास्थित ज्ञान हे सर्व मी विघ्नराजांना समर्पित करीत आहे. एक वा अनेक रूपात असणारे सर्व योगाकार रूपात विघ्नेशच विविध भोगांचा भोग घेतात. मी माणूस नाहीच तर साक्षात् गणनाथच क्रीडा करीत आहेत. स्वामी तथा सेवक भावाने तो ब्रह्मरत शोभून दिसतो. (अर्थात भावनेच्या पातळीवर मी त्यांचा सेवक आहे ही भूमिका असते.)

हे विप्रांनो! अशाच रीतीने शुक्राचार्य, मुद्गलाचार्यादि योगी श्रीगणेशार्चन करतात. हे सर्व श्रीगणेशांचे रहस्य मी तुम्हास सांगितले. त्यानुसार श्रीविघ्नेशांना संतुष्ट करावे.

जसे देहातील इंद्रियांमध्ये हृदय सर्वात महत्वाचे असते, तेथे जीवरूपात श्रीगणेश निवास करतात. तसे हे श्रीगणेशांचे हृदय आहे तेथे साक्षात योगपती ब्रह्मनायक ब्रह्मणस्पती राहतात. याद्वारे जो कोणी माणूस श्रीगणेशांना संतुष्ट करेल तो सकल भोगांना भोगून अंती योगमय होईल. असे माझे वचन ऐकून ते ब्रह्मपुत्र सनकादिक मला वंदन करून वनात गेले. एकाक्षर मंत्राच्या पंचकाचे सेवन करून श्रीगणेशहृदय जाणून गाणपत्य झाले. तेव्हापासून ते नित्य श्रीगणेशहृदयाचा जप करीत मनोवांछित गतीने भ्रमण करीत राहतात. त्यामुळे देखील परमश्रेष्ठ गणेशहृदयाचे सेवन करावे त्याने गाणपत्य प्रमुख होशील.

श्रीमुद्‌गलाचार्य म्हणतात - असे म्हणून श्रीशंकरांनी श्रीशेषराजांस श्रीगणेश एकाक्षरी मंत्रविधान पूर्वक प्रदान केला. त्यांनी यथाविधी त्याचे अनुष्ठान करून हृदयस्थ होऊन नित्य हृदयाद्वारे श्रीगणेशांची स्तुती करू लागला.

पुण्यकारक श्रीगणेशहृदय ऐकावे वा ऐकवावे. इच्छित प्राप्ती होऊन अंती तो ब्रह्मरूप होतो. नित्य जर कोणी गणेशहृदयाचा पाठ करील तर तो गणेशरूपच होय. त्याच्या दर्शनानेही सिद्धी लाभते. याच्या पठणाने पुत्र, पौत्र, कलत्र, धन, धान्य, अचल आरोग्य, वैभव सर्व प्राप्त होते. जो एकवीस दिवस एकवीस वेळा चिंतनासह हे गणेशहृदय म्हणेल त्यास इच्छित मिळेल.

मारणा, उच्चाटन, वशीकरण, मोहकरण अशा परकृत बाबींचा याच्या पाठाने नाश होतो. संग्रामात जय मिळतो. वीरश्रीयुक्त होतो. हे दक्षा! याच्या पाठाने काहीही असंभव राहात नाही. विद्या, आयुष्य, यश, प्रज्ञा मिळते. अंगहीनास अंग मिळते. जे जे काही मनात येईल ते ते निश्चितपणे मिळत असते. याच्या समान शीघ्र कार्यसिद्धि देणारे काहीही नाही. साक्षात गणनाथांचे हृदयच मी सविधान सांगितले आहे. गणेशभक्तिहीनास, दुर्विनीतास तथा द्वेषकारीस हे गणेशहृदय कधीही देऊ नये. गणेश भक्तिकारास, साधूस प्रयत्नपूर्वक द्यावे. त्याने श्रीविघ्नराज प्रसन्न होतील. श्रीमहागणेशांचे महासिद्धीप्रद हृदय तुला सांगितले. हे प्रजापते! दक्षा आणखी काय ऐकण्याची इच्छा आहे.

जय गजानन!

